राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान कार्यक्रमाकरिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता आदिवासी उपयोजनेंतर्गत (TSP) प्राप्त झालेला केंद्र हिस्सा वितरीत करणेबाबत. **( २२१० F७४७ )**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६ /प्र.क्र.०५ /कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीखः- २९ मार्च, २०१७.

**वाचा -**

१) वि. वि,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५,दि.१०.५.२०१६.
३) केंद्र शासन पत्र क्रमांक L १९०११२/१५/२०१६-UH, दिनांक २६-१२-२०१६.
४) केंद्र शासन पत्र क्रमांक L.१९०१२ / १५ / २०१६- UH, दिनांक २६-१२-२०१६.
५) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र. रानाआ- ३११७ / प्र. क्र. ५४ / २०१७/ आ-७.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१-नागरी आरोग्य सेवा-विषमचिकित्सा, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, ०१-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना--राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०३) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान ( केंद्र हिस्सा ), ( २२१० F७४७ ), ३१ -सहाय्यक अनुदाने ( वेतनेत्तर ) या शिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षात रु.१७६६.२५ लाख निधी अर्थसंकल्पित आहे.

केंद्र शासनाने या योजनेखाली त्यांच्या वरील संदर्भ क्र. (३) व (४) मधील पत्रान्वये अनुक्रमे रु. ४५०.०० लक्ष व रु. २३.००लक्ष इतका निधी आदिवासी उपयोजना घटकाखाली राज्य शासनास वितरीत केलेला आहे. संदर्भ क्र. ५ मधील नस्तीत सदर केंद्र सहाय्य राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा असल्याचे वित्त विभागाने प्रमाणित केले आहे. सबब, केंद्र शासनाने राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत (०१) (०३) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान ( केंद्र हिस्सा ), ( २२१० F७४७ ), ३१ -सहाय्यक अनुदाने ( वेतनेत्तर ) याखाली वितरीत केलेला रु. ४७३.०० लाख ( अक्षरी रुपये चार कोटी त्र्याहत्तर लाख फक्त ) इतका निधी या योजनेचे नियंत्रक अधिकारी प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन

करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

४. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, सार्वजनिक आरोग्य विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. सदर शासनादेश **वाचा** येथिल क्रमांक ५ मधील नस्तीत वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेच्या अनौ.संदर्भ क्रमांक ५९ / अर्थोपाय दि. ०८ /०२ /२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१४४२२८९६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.29 14:50:17 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
२) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३) सर्व जिल्हाधिकारी,महाराष्ट्र राज्य

४) महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई

५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

६) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

७) विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

८) अधिदान व लेखधिकारी,मुंबई.

९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१०) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-६), मंत्रालय, मुंबई

१२) कार्यासन अधिकारी (का.क्र. ८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.